**राज्य माहिती आयोगाच्या विविध खंडपीठातील सहायक कक्ष अधिकाऱ्यांच्या सेवा मंत्रालयीन विविध विभागात प्रत्यावर्तीत करण्याबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन आदेश क्रमांकः एएससी १५१७/प्र.क्र.१३७/१४-अ**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
तारीख: १३ जून, २०१८

वाचा :- १) सा.प्र.वि., क्र.एएससी १५१०/प्र.क्र.२१७/१०/१४-अ, दिनांक २०-०१-२०१४ चे आदेश

**शासन आदेश**

संदर्भाधिन आदेशान्वये श्रीमती क्षि.प्र.पाटील, सहायक कक्ष अधिकारी, औरंगाबाद खंडपीठ व श्री.अ.म.संद्री, सहायक कक्ष अधिकारी, औरंगाबाद खंडपीठ यांच्या सेवा मंत्रालयीन विभागात प्रत्यावर्तीत करण्यात आले होते. सदरहू आदेश या आदेशान्वये रद्द करण्यात येत आहे.

२. सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक : एसआरव्ही २०११/प्र.क्र.१३७/का.१२, दिनांक १७.१२.२०१६ अन्वये प्रतिनियुक्तीचे धोरण निश्चित करण्यात आले असून, या शासन निर्णयास शा.नि. क्र.एसआरव्ही-२०१६/प्र.क्र.५१०/कार्या-१२, दिनांक १६-०२-२०१८ अन्वये दि.१७-१२-२०१६ च्या शासन निर्णयातील परि.५ मध्ये पुढीलप्रमाणे सुधारणा करण्यात आली आहे:-

क) परि.क्र ५(अ) (३) पुढीलप्रमाणे सुधारीत करण्यात येत आहे.:-

परि.क्र. ५(अ) (३):- प्रतिनियुक्ती प्रथमत: ३ वर्षासाठी देण्यात यावी व संबंधित अधिकाऱ्याची इच्छुकता व संवर्ग नियंत्रण विभागाचे सहमतीने हा कालावधी चौथ्या वर्षाकरिता वाढविण्यात यावा. परंतु चार वर्षांचा प्रतिनियुक्तीचा कालावधी पूर्ण झाल्यानंतर आणखी एक वर्षासाठी म्हणजेच ५ व्या वर्षासाठी मुदतवाढ द्यावयाची झाल्यास मा. मुख्यमंत्री यांची विनिर्दिष्टपणे मान्यता घेण्यात यावी. ५ वर्षाचा कालावधी संपल्यानंतर कोणत्याही परिस्थितीत मुदतवाढ अनुज्ञेय राहणार नाही.

३. वर परिच्छेद २ मधील शासन निर्णयातील तरतूदी विचारात घेता राज्य माहिती आयोगाच्या विविध कार्यालयात कार्यरत खालील कर्मचाऱ्यांच्या सेवा प्रतिनियुक्तीने **रकाना ५** येथील दिनांकास उपलब्ध करुन देण्यात आल्या होत्या. सदरहू कर्मचाऱ्यांचा प्रतिनियुक्तीच्या पदावरील बहुतेक **४ वर्षाचा कालावधी पुर्ण झालेला असल्यामुळे तर काही सहायक कक्ष अधिकाऱ्यांचे** सेवा या आदेशान्वये संपुष्टात आणून त्यांची सेवा प्रत्यावर्तीत करण्यात येत असून, सेवा प्रत्यावर्तीत केल्यानंतर त्यांची पदस्थापना **रकाना ६ मधील** मंत्रालयीन विभागात पदस्थापना करण्यात येत आहे.

| अ. क्र. | सहायक कक्ष अधिकाऱ्याचे नांव | विभाग | प्रतिनियुक्तीचे कार्यालय | प्रतिनियुक्तीचा दिनांक | सेवा प्रत्यावर्तित केल्यानंतर पदस्थापनेचा मंत्रालयीन प्रशासकीय विभाग |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १ | श्रीमती क्षि.प्र.पाटील | सा.बां.वि | राज्य माहिती आयोग, औरंगाबाद खंडपीठ | ०१-१०-२००९ | गृह विभाग |
| २ | श्री.अ.म.संद्री | शाशिवक्रीवि | राज्य माहिती आयोग, औरंगाबाद खंडपीठ | ०४-०७-२००९ | महसूल व वन विभाग |
| ३ | श्रीमती योगिता डांगरे | जलसंपदा | राज्य माहिती आयोग, नागपूर खंडपीठ | ०१-१२-२०१२ | जलसंपदा विभाग |
| ४ | श्रीमती शैला कि. जंगम | नविवि | राज्य माहिती आयोग, पुण खंडपीठ | ०१-०३-२०१३ | जलसंपदा विभाग |
| ५ | श्रीमती मि.म. जानराव | वैशिवऔद्रवि | राज्य माहिती आयोग, पुण खंडपीठ | ०८-०७-२०१३ | जलसंपदा विभाग |
| ६ | श्री.दे.ओ.चव्हाण | वैशिवऔद्रवि | राज्य माहिती आयोग, अमरावती खंडपीठ | ०१-१२-२०१५ | गृह विभाग |
| ७ | श्री. सुरज पांगारकर | साप्रवि | राज्य माहिती आयोग, अमरावती खंडपीठ | ०१-०२-२०१४ | सामान्य प्रशासन विभाग |

संबंधित राज्य माहिती आयोगाचे लक्ष सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय, दिनांक १७-१२-२०१६ व दिनांक १६-०२-२०१८ मधील तरतूदीकडे वेधण्यात येत असून उपरोक्त कर्मचाऱ्यांना संबंधित राज्य माहिती आयोग, कार्यालयाने तत्काळ कार्यमुक्त करावे.

३. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०६१३११५०१५३९०७ असा आहे. हा परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Gajanan Bhimrao Gurav

Digitally signed by Gajanan Bhimrao Gurav
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8a5b973b0795ae988a7c005050f9180a8021798a5c1ed41ada8a72725a47b4f0, serialNumber=54b11b1ccbdc577d71dce3b313c3fef5dc2ad659e360f73b682d6b6fccb8aecf, cn=Gajanan Bhimrao Gurav
Date: 2018.06.13 11:49:58 +05'30'

**(ग.भि.गुरव)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

**संबंधित कर्मचारी (आयोगाच्या कार्यालयामार्फत)**

**प्रत,**

१. सचिव, राज्य माहिती आयोग, महाराष्ट्र, नवीन प्रशासकीय इमारत, १३ वा मजला, मंत्रालय, मुंबई-४०००३२

त्यांना विनंती करण्यात येते की, सेवा प्रत्यावर्तीत करण्यात आलेल्या कर्मचाऱ्यांना तत्काळ कार्यमुक्त करण्याबाबतच्या सूचना आपल्या स्तरावरुन संबंधितांना देण्यात याव्यात.

२. उप सचिव, राज्य माहिती आयोग, नागपूर खंडपीठ, प्रशासकीय इमारत क्र.२, सिव्हिल लाईन्स, नागपूर

३. उप सचिव, राज्य माहिती आयोग, पुणे खंडपीठ, नवीन प्रशासकीय इमारत, ४था मजला, विधानभवनासमोर, पुणे-४११ ००१

४. उप सचिव, राज्य माहिती आयोग, औरंगाबाद खंडपीठ, बचत भवन, लेखा व कोषागारे कार्यालयाच्या पाठीमागे, औरंगाबाद

५. सह/उप सचिव (आस्थापना), गृह विभाग/महसूल व वन विभाग/जलसंपदा विभाग/ सामान्य प्रशासन विभाग/सार्वजनिक बांधकाम विभाग/शालेय शिक्षण व क्रिडा विभाग/ वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग/नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२

६. उप सचिव (का.क्र.६), सामान्य प्रशासन विभाग, नवीन प्रशासकीय इमारत, मंत्रालयसमोर, मुंबई ४०० ०३२. त्यांना विनंती करण्यात येते की, सेवा प्रत्यावर्तीत करण्यात आलेल्या कर्मचाऱ्याला तत्काळ कार्यमुक्त करण्याबाबतच्या सूचना आपल्या स्तरावरुन संबंधितांना देण्यात याव्यात.

७. साप्रवि/१४-अ (संग्रहार्थ)